**वृत्तपत्रामध्ये प्रसिध्द केलेल्या जाहिरातीचे शुल्क अदा करण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण-२०१७/प्र.क्र.११६/टीएनटी-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार भवन,
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २७ जून, २०१७.

वाचा :- पत्र क्र. न्यायाप्र-२०१५/प्र.क्र.३२५/टिएनटी-१, दि.१८ जुलै, २०१६.

**प्रस्तावना** :-

शासनामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना व उपक्रमांची माहिती जनसामान्यांपर्यत पोहोचविण्यासाठी जाहिरात हे एक प्रभावी माध्यम आहे. त्यादृष्टीने शालेय शिक्षण व क्रीडा विभागामार्फत महाराष्ट्र खाजगी शाळेतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मध्ये मागासवर्गीयांच्या आरक्षणाबाबतच्या नियम ९ च्या काही उप नियमामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्या अनुषंगाने सुधारित नियम प्रसिध्द करण्यापूर्वी राज्यातील नागरिक / संघटना यांचेकडून संबंधित तरतूदीबाबत हरकती / सुधारणा मागविणे आवश्यक असल्याने सदर प्रारुप-नियम शासनाच्या संकेत स्थळावर प्रसिध्द करण्यात आले. सदर प्रारुप-नियम हे सविस्तर स्वरुपात शासनाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात येत असल्याबाबत जाहिर नोटीस राज्यस्तरावरील जादा खपाच्या दोन मराठी वृत्तपत्रातून प्रसिध्दीस देण्याकरिता महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांच्यामार्फत वृत्तपत्रात जाहिरात देण्यात आली. त्या अनुषंगाने होणाऱ्या खर्चाकरिता प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र खाजगी शाळेतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील मागासवर्गीयांच्या आरक्षणाबाबतच्या नियम ९ च्या काही उप नियमामध्ये दुरुस्ती करण्यापूर्वी नागरिकांकडून सुधारणा/हरकती मागविण्यासाठी शालेय शिक्षण व क्रीडा विभागातर्फे खालील परिशिष्ट-“अ” मध्ये नमूद दिनांकाला प्रसिध्द करण्यात आलेल्या जाहिरातीवर झालेल्या एकूण रु. ७,२००/- (रुपये सात हजार दोनशे फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**परिशिष्ट-“अ”**

| अ.क्र. | वृत्तपत्राचे नाव | जाहिरातीचा दिनांक | देयक क्रमांक | रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | लोकसत्ता | २१ जुलै, २०१६ | १००२४८६९५० | ३२००/- |
| २ | महाराष्ट्र टाईम्स | २१ जुलै, २०१६ | २१३९३६२७/००१ | ४०००/- |
| | | | **एकूण** | **७२००/-** |

२. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात वितरीत केलेला सदर निधी / अनुदान आंहरण व संवितरण अधिकाऱ्यांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून तातडीने वितरीत करण्यात यावा :-

अ) ज्या उद्देशासाठी निधी / अनुदान मंजूर आहे त्या व्यतिरिक्त इतर उद्देशासाठी खर्च करता येणार नाही. तसेच सदर निधी / अनुदान इतर लेखाशीर्षाकडे वळती करता येणार नाही.

आ) सदर खर्चाचा प्रगती अहवाल मासिक निधी विवरणपत्रानुसार नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास सादर करावा.

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहायक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे यांना या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणाऱ्या निधीकरिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर बाबीवर होणारा खर्च मागणी क्र.ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ८०, सर्वसाधारण ००१, संचालन व प्रशासन - (००) (०१) शिक्षण संचालक दत्तमत (२२०२ १०९१), १६ प्रकाशने या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित केलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१७०६२७१७११२३६०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dattatray Mane

Digitally signed by Sanjay Dattatray Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5938dfcf55dfa4d20c3c2b25ee54999d774aedb59d71b14cfc2860776279ef16, serialNumber=cc816238ed3c914e2fa2e99da4bc0ba4e1f6947aa23ad145e3dc6a469041090f, cn=Sanjay Dattatray Mane
Date: 2017.06.27 17:07:48 +05'30'

**( संजय माने )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक
२. प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे स्वीय सहायक
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),(लेखा परीक्षा), महाराष्ट्र- १/२, मुंबई / नागपूर
४. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
५. सहायक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, शिक्षण संचालनालय, पुणे
६. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सह सचिव / उप सचिव ( टिएनटी / अर्थसंकल्प ) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. शिक्षण संचालक, (प्राथमिक / माध्य. व उच्च माध्य.) महाराष्ट्र राज्य, पुणे
११. वित्त विभाग (व्यय-५ / अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (टिएनटी-१), मंत्रालय, मुंबई.